२०११०४३०११२५३३००१

सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात
जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण
अभियानाअंतर्गत लहान व मध्यम शहरांतील
पायाभूत सुविधांचा विकास कार्यक्रम
(UIDSSMT) या उपअभियानाखाली मंजूर
प्रकल्पांना पूरक अनुदान वितरण

# महाराष्ट्र शासन

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्र. युआयडी-२०१०/प्रक्र-३३४/नवि-३३**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक : ३१ मार्च,२०११**

<u>संदर्भ</u>: शा. नि. क्र. एनयुआर-२००९/प्र.क्र.१२७/०९/नवि-३३, दिनांक ३१ ऑगस्ट, २००९

<u>प्रस्तावना</u> : नागरीकरणाचा वाढता वेग व व्याप्ती विचारात घेवून केंद्र शासनाने देशातील लहान व मध्यम शहरांमध्ये पायाभूत सोयीसुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी जाहिर करण्यात आलेल्या जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानाचे उपअभियान (UIDSSMT) अंतर्गत महाराष्ट्रातील महानगरपालिका/नगरपरिषदा यांचे शहर विकास आराखडे (CDPs) व सविस्तर प्रकल्प अहवाल (DPRs) महाराष्ट्राच्या राज्यस्तरीय मंजुरी समितीच्या मान्यतेने केंद्र शासनास सादर करण्यात आले होते. केंद्र शासनाने उक्त योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील महानगरपालिका/ नगरपरिषदेच्या सादर प्रकल्पांना मंजुरी देवून राज्यातील महानगरपालिका आणि नगरपरिषदां यांना निधी वितरीत केला आहे.

उक्त योजनेच्या मार्गदर्शक तत्वानुसार केंद्र शासनाने मंजूर केलेल्या प्रकल्प किमतीपैकी केंद्र शासन, राज्य शासन व महानगरपालिका/नगरपालिका यांच्या हिश्श्याचा मंजूर आकृतीबंध खालीलप्रमाणे आहे.

| UIDSSMT अंतर्गत मंजूर प्रकल्पाची एकूण किंमत | केंद्र शासनाचा हिस्सा | राज्य शासनाचा हिस्सा | महानगरपालिका/ नगरपालिकांचा हिस्सा |
|---|---|---|---|
| १०० | (८० %) | (१० %) | (१० %) |

या योजनेअंतर्गत केंद्रीय निधी प्राप्त होण्यासाठी केंद्र शासनासोबत राज्य शासन व खालील नमूद नगरपालिकांनी सक्तीच्या व वैकल्पिक सुधारणा क्षेत्रांत प्रगती करण्याबाबत करारनामा केला आहे. हा करारनामा झाल्यानंतर केंद्र शासनाने संदर्भाधिन पत्रानुसार राज्यातील नगरपरिषदांना निधी वितरीत केला आहे. संदर्भाधीन शासन निर्णय नुसार लहान व मध्यम शहरांसाठी पायाभूत सुविधांचा विकास कार्यक्रम (UIDSSMT) या कार्यक्रमांतर्गत मंजूर प्रकल्पांसदर्भात फक्त दरसूचीतील फरकामुळे प्रकल्पांच्या अंदाजपत्रकीय किंमतीत होणारी वाढ याची ५० % रक्कम पुरक अनुदानाच्या स्वरुपात राज्यशासनाकडून संबधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना उपलब्ध करुन देण्यात येते. तथापि देण्यात येणाऱ्या पुरक अनुदान रकमेचे वितरण केंद्र शासनाकडून दुसऱ्या हप्त्याच्या अनुदानाचे वितरण झाल्यानंतर तसेच दुसऱ्या हप्त्याच्या अनुदानाचा संपूर्ण खर्च झाल्यानंतर करण्यात येते. त्यानुसार या तीन नगरपरिषदांना दरसूचीतील झालेल्या फरकामुळे प्रकल्प किंमतीत होणाऱ्या वाढीसाठी ५०% पुरक अनुदान देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय :</u> अर्थसंकल्पीय तरतुदींची उपलब्धतता लक्षात घेऊन खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे निधी पुरक अनुदान स्वरुपात वितरीत करण्यास मंजुरी देण्यात येत आहे. लहान व मध्यम शहरांतील पायाभूत सुविधांचा विकास

कार्यक्रम (UIDSSMT) अंतर्गत खालीलप्रमाणे रकमांचे पुरक अनुदान म्हणून वितरण करण्यास शासन अनुमती देत आहे.

( रु. कोटीत )

| अ क्र. | स्थानिक स्वराज्य संस्था | प्रकल्प | प्रकल्पाची किंमत | निविदा मंजूर केलेल्या वर्षाच्या दरसूचीनुसार होणारी किंमत/स्वीकृत निविदेची किंमत | दरसूची मधील फरक | फरकाच्या रक्कमे-नुसार ५० टक्के अनुज्ञेय अनुदान | सद्य: स्थितीत दयावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | लातूर | कन्स्ट्रक्शन ऑफ ड्रेन्स | ५५.३१ | ७४.८२ | १९.५१ | ९.७६ | ९.७६ |
| २ | लातूर | रस्ते विकास | ३५.९१ | ४८.०१ | १२.१ | ६.०५ | ६.०५ |
| ३ | भोर | पाणीपुरवठा | ३.१९ | ४.६५ | १.४६ | ०.७३ | ०.९ |
| ४ | बारामती | पाणीपुरवठा | १३.६८ | २२.०८ | ८.४ | ४.२ | ४.२ |
| ५ | चिपळूण | पाणीपुरवठा | ९.५६ | १२.३३ | २.५७ | १.३९ | १.३९ |
| ६ | कोल्हापूर | पाणीपुरवठा | ५८.४४ | ८५.०९ | २६.६५ | १३.३२ | ९.३७ |
| ७ | शिर्डी | भुयारी गटार | २४.२६ | ३६.२६ | १२ | ६ | ६ |
| ८ | लातूर | रस्ता दुभाजक व पादचारी मार्ग | ८.८० | १०.७८ | १.९८ | ०.९९ | ०.९९ |
| ९ | लातूर | गोलाईचे सौंदर्यीकरण | ०.६३ | ०.८३ | ०.२ | ०.१ | ०.१ |
| १० | विटा | पाणीपुरवठा | ७.४७ | १०.८९ | ३.४२ | १.७१ | १.७१ |
| ११ | शेगाव | पाणीपुरवठा | ३८.८१ | ४६.९३ | ८.१२ | ४.०६ | ४.६ |
| १२ | जयसिंगपूर | पाणीपुरवठा | ६.९१ | ८.९९ | २.०८ | १.०४ | १.०४ |
| १३ | जालना | पाणीपुरवठा | १२३.९९ | १७८.५४ | ५४.५५४६ | २७.२८ | १९.३५ |
| १४ | परभणी | पाणीपुरवठा | १०४.४८ | १३० | २५.५२ | २९.२१४५ | २०.७६ |
| १५ | काटोल | पाणीपुरवठा | १९.१७ | २६.७४ | ७.५७ | ३.७८ | ३.७८ |
| | | | | | एकूण | | ९०.०० |

यासाठी **श्री. का. तु. सातकर, उपसचिव, नगर विकास विभाग** यांना **"नियंत्रण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे व **श्री. आ.रा. राजपूत, कक्ष अधिकारी, नगरविकास विभाग** यांना **"आहरण व संवितरण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी पुरक अनुदान रु. ९०,००,००,०००/- (रुपये नव्वद कोटी,

फक्त) इतक्या रकमेचा धनादेश ' आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई' { Commissioner & Director of Municipal Administration, Mumbai } या नावे काढावा आणि त्यांनी सदर रकमेचे वितरण संबंधित नगपरिषदेस तात्काळ करावे.

०२. उपरोक्त तक्त्यात नमूद नगरपरिषदांनी त्रिपक्षीय करारनाम्यात नमूद केलेल्या सुधारणांबाबत वर्षनिहाय केलेली प्रगती पाहून तसेच वितरित केलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र दिल्यानंतरच योजनेअंतर्गत केंद्र शासन व राज्य शासनाचा पुढील हिस्सा वितरित करण्यात येईल.

०३. केंद्र शासनाकडून प्रत्यक्ष पाहणीद्वारे या योजनेअंतर्गत प्रकल्पाच्या अंमलबजावणीचा तसेच सुधारणा क्षेत्रातील प्रगतीचा आढावा घेण्यात येईल. सदर नगरपरिषदांनी दर तीन महिन्यांनी राज्यस्तरीय नोडल एजन्सीमार्फत राज्य तसेच केंद्र शासनाच्या हिश्याच्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचा अहवाल राज्य शासन तसेच, केंद्र शासनास सादर करावा. अशाप्रकारे तिमाही अहवाल सादर करण्यास विलंब झाल्यास त्यांना पुढील हिस्सा प्रलंबित विनियोग अहवाल प्राप्त होईपर्यन्त वितरित करण्यात येणार नाही.

०४. प्रस्तुत योजनेअंतर्गत सर्व प्रकल्पांची अंमलबजावणी पूर्ण झाल्यानंतर या योजनेमधून काय साध्य झाले याबाबतचा अहवाल सदर नगरपरिषदांनी राज्य शासन व केंद्र शासनास सादर करावा.

०५. सदर नगरपरिषदांना देण्यात येणाऱ्या अनुदान रु. ९०,००,००,०००/- (रुपये नव्वद कोटी, फक्त) इतक्या रकमेचा खर्च हा मागणी क्र. एफ-२, २२१७, नगर विकास, ८०-सर्वसाधारण, १९१- स्थानिक संस्था, महानगरपालिका, नगरविकास प्राधिकरणे, नगर सुधार मंडळे, इत्यादींना सहाय्य, राज्यसहायीत योजना, (००) (५८) जेएनएनयुआरएम/युआयडीएसएसएमटी/आयडीएसएमटी प्रकल्प पूर्ण करण्यासाठी राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अतिरिक्त अनुदान (२२१७८०३९), ३१- सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २००९-२०१० या आर्थिक वर्षातील मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

०६. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक: १५४/व्यय-३ , दिनांक १५/०३/२०११ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( रा. वि. कुलकर्णी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति --

१) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)-१ , मुंबई
२) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)- २ , नागपूर
३) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
४) अधिदान व लेखाधिकारी, (फोर्ट) मुंबई
५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६) प्रधान सचिव, वित्त / प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई-३० तथा नोडल एजन्सी
८) आयुक्त /मुख्याधिकारी, संबंधित महानगरपालिका/ नगरपरिषदा
१०) कक्ष अधिकारी (नवि-४) नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई
११) कक्ष अधिकारी (नवि-५) रोखशाखा, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती (नवि-३३).